आस्थापना - नागपूर विभाग

**एकूण १५३४ अस्थायी पदांना दिनांक ०१ ऑक्टोबर, २०१९ ते दिनांक २९ फेब्रुवारी, २०२० या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएसटी -२०१८/प्र.क्र. ३८/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २२ ऑक्टोबर, २०१९.

संदर्भ :-

१. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : संकिर्ण-१००२/प्र.क्र. ६६(भाग-२)/ ई-८, दि. २०/०३/२००६.
२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : प्राफेब-२०१०/प्र.क्र.-२६/पुनर्बांधणी-३/ म-१०, दि. ३०/०७/२०१३.
३. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : ईएसटी-२०१७/प्र.क्र.३८/ई-८, दि. १५/०४/२०१७.
४. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.२१/०२/२०१९
५. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. ईएसटी-२०१९/प्र.क्र.३८/ई-८, दि.०४/०४/२०१९.
६. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.११/०९/२०१९.
७. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांचे पत्र क्र. मशा ७(१)/आस्था-२/ सीआर०३(१६)/कावि-१४४७/२०१९, दि.२६/०९/२०१९

प्रस्तावना:-

विभागीय आयुक्त, नागपूर तसेच जिल्हाधिकारी, नागपूर, वर्धा, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली यांच्या कार्यालयाच्या आस्थापनेवरील व त्यांच्या अधिपत्याखालील उप विभागीय अधिकारी, तहसिलदार व मंडळ अधिकारी या क्षेत्रिय कार्यालयातील आकृतीबंधातील १५३४ अस्थायी पदांना संदर्भाधिन शासन निर्णय क्र. ६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

विभागीय आयुक्त, नागपूर तसेच जिल्हाधिकारी, नागपूर, वर्धा, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली यांच्या कार्यालयाच्या आस्थापनेवरील व त्यांच्या अधिपत्याखालील उप विभागीय अधिकारी, तहसिलदार व मंडळ अधिकारी या क्षेत्रिय कार्यालयातील आकृतीबंधातील संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रामधील १५३४ अस्थायी पदांना **दिनांक १ ऑक्टोबर, २०१९ ते दिनांक २९ फेब्रुवारी, २०२०** या कालावधीसाठी वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.११/९/२०१९ च्या शासन निर्णयातील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर अस्थायी पदांवर होणारा खर्च संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयासोबतच्या संबंधित विवरणपत्रातील रकाना- क्र. ५ मध्ये दर्शविलेल्या लेखाशिर्षाखालील सन २०१९-२०२० साठी मंजूर झालेल्या अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा.

३. **वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.११/९/२०१९ च्या शासन निर्णयात दरम्यानच्या काळात सुधारित आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक असल्याचे तसेच यानंतर सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याकरिता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही, याची सर्व विभागांनी नोंद घेण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे.** त्यानुसार सर्व आस्थापनांनी सुधारित आकृतीबंध तात्काळ प्रशासकीय विभागास सादर करावेत.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.११/०९/२०१९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१९१०२२१७०७३४९११९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=3d2bd4ed83b4c722151f75f40dad09e69527159e04d26476bbf5363e7b1c3cb2, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=704cb545c50221b15cde7ccb8854e694c765dfb3a0240e891ebfb56ee79e3440, ou=REVENUE, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2019.10.22 17:09:51 +05'30'

**( अजित देशमुख )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
२) जिल्हाधिकारी, नागपूर/ वर्धा/ भंडारा/ गोंदिया/ चंद्रपूर व गडचिरोली.
३) अपर जिल्हाधिकारी/उप विभागीय अधिकारी/ तहसीलदार /मंडळ अधिकारी.
(संबंधित जिल्हाधिकारी यांच्यामार्फत)
४) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा) २, महाराष्ट्र, नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/ वर्धा/ भंडारा/ गोंदिया/ चंद्रपूर व गडचिरोली.
६) सह सचिव /उप सचिव, कार्यासन(आ.पु.क./व्यय-९),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
७) उप सचिव, कार्यासन ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.